**महाराष्ट्र वनसेवेतील विभागीय वन अधिकारी, गट -अ (वरिष्ठ श्रेणी) व सहाय्यक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदीत करणे व पुनर्विलोकीत करण्याबाबत..**

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
**शासन परिपत्रक क्रमांक: पी-८५/०८/प्र.क्र.४७/फ-८.**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४/१/२०११.

पहा :- सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक सीएफआर-१२९५/प्र.क्र.३६/९५/तेरा, दि.१.२.१९९६

**शासन परिपत्रक :-**

शासकीय अधिकारी / कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल जतन करणे याबाबत तसेच स्वयंमुल्य निर्धारण अहवाल पध्दती सुरू करण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १.२.१९९६ च्या शासन निर्णयान्वये आवश्यक ते आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. महाराष्ट्र वनसेवेतील विभागीय वन अधिकारी, गट-अ (वरिष्ठ श्रेणी) तसेच सहाय्यक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) यांच्याबाबतीत गोपनीय अहवाल प्रतिवेदीत व पुनर्विलोकीत करण्याबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांच्या दि.९.१.१९८६ च्या व दि.२८.६.२००० च्या परिपत्रकान्वये काही सूचना देण्यात आलेल्या आहेत. मात्र सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१.२.१९९६ च्या आदेशांच्या अनुषंगाने महाराष्ट्र वनसेवेतील अधिकाऱ्यांच्या बाबतीत त्यांचे गोपनीय अहवाल कोणी प्रतिवेदीत वा पुनर्विलोकीत करावे याबाबत शासन आदेश निर्गमित करण्यात आलेले नाहीत. त्यामुळे विभागीय वन अधिकारी , गट -अ (वरिष्ठ श्रेणी) व सहाय्यक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदीत व पुनर्विलोकन करणे याबाबतीत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याबाबत शासनाच्या विचाराधीन होते. याशिवाय सदरहू गोपनीय अहवाल इंग्रजीमध्ये प्रतिवेदीत करावे किंवा कसे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. वरील सर्व बाबींचा विचार करून विभागीय वन अधिकाऱ्यांचे व सहा.वनसंरक्षकांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदन व पुनर्विलोकन करण्याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

१) खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे विभागीय वन अधिकारी व सहा.वनसंरक्षक यांचे गोपनीय अहवाल प्रतिवेदीत व पुनर्विलोकीत करण्यात यावेत.

## प्रतिवेदन /पुनर्विलोकन करण्याबाबतचा तक्ता

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे पदनाम | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | विभागीय वन अधिकारी | संबंधित मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक / मुख्य वनसंरक्षक |
| २ | विभागीय वन अधिकारी (वन्यजीव) | संबंधित मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) / वनसंरक्षक (वन्यजीव) | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) |
| ३ | सहाय्यक वनसंरक्षक | संबंधित अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक / मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक/ उपवनसंरक्षक/ विभागीय वन अधिकारी | प्रतिवेदन अधिकाऱ्यांचे नियंत्रक अधिकारी |
| ४ | सहाय्यक वनसंरक्षक (वन्यजीव) | संबंधित मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक/ उपवनसंरक्षक/ विभागीय वन अधिकारी | प्रतिवेदन अधिकाऱ्यांचे नियंत्रक अधिकारी |

२) वरील अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल पुनर्विलोकन करताना पुनर्विलोकन अधिकाऱ्यांमध्ये संभ्रम निर्माण होत असल्यास ज्या प्रतिवेदन अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल जो अधिकारी प्रतिवेदीत करील तो अधिकारी संबंधित विभागीय वन अधिकारी अथवा सहा.वनसंरक्षक यांचे गोपनीय अहवाल पुनर्विलोकीत करील.

३) विभागीय वन अधिकारी/ सहा.वनसंरक्षक या संवर्गातून भारतीय वनसेवेत पदोन्नती देण्यात येत असल्यामुळे केंद्रीय लोकसेवा आयोगाला गोपनीय अहवाल उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने विभागीय वन अधिकारी / सहा.वनसंरक्षक यांचे गोपनीय अहवाल इंग्रजीमधून प्रतिवेदीत व पुनर्विलोकीत करण्यात यावेत.

४) विभागीय वन अधिकारी / सहा.वनसंरक्षक यांचे गोपनीय अहवाल पुनर्विलोकीत केल्यानंतर संबंधित पुनर्विलोकन अधिकाऱ्यांनी त्यांच्याकडील गोपनीय अहवाल २ प्रतींमध्ये प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडे पुढील कार्यवाहीसाठी पाठविण्यात यावेत.

५) प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांच्याकडे प्राप्त झालेले गोपनीय अहवाल संस्करणासाठी लवकरात लवकर शासनाकडे पाठविण्याची दक्षता घ्यावी.

६) प्रतिनियुक्तीवर असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांचे गोपनीय अहवाल दर वर्षाच्या १५ मे च्या आत प्रधान मुख्य वनसंरक्षक कार्यालयामार्फत शासनास प्राप्त होतील याची खबरदारी घ्यावी.

७) प्रतिवेदन अधिकारी / पुनर्विलोकन अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियंत्रणाखालील अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल लिहीताना त्यांना वेळोवेळी आढळून आलेल्या उल्लेखनीय गोष्टी किंवा प्रतिकूल गोष्टी यांच्या संदर्भासहीत नोंदी ठेवलेल्या कच्चे टिपणाचा (EphemOral Roll) ( सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १.२.१९९६ च्या शासन निर्णया सोबतच्या परिशिष्ट -क नुसार) आधार घ्यावा.

८) गोपनीय अहवाल लिहीताना प्रतिवेदीत व पुनर्विलोकन अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१.२.१९९६ च्या शासन निर्णयातील तसेच सामान्य प्रशासन विभागाकडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या शासन निर्णय/ परिपत्रकामधील आदेश / सूचनांचे पालन करण्यात यावे.

९) प्रधान मुख्य वनसंरक्षक, म.रा.नागपूर कार्यालयाने शासनाकडे गोपनीय अहवाल पाठविताना ते दर वर्षाच्या १५ मे पुर्वी पाठविण्याबाबत तसेच संबंधित अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल पूर्ण आर्थिक वर्षाचे असतील याची दक्षता घ्यावी. ज्या कालावधीचे गोपनीय अहवाल उपलब्ध नसतील त्याबाबतचे प्रमाणपत्र द्यावे वा त्याबाबतची कारणे नमूद करावी. ज्या कालावधीचे गोपनीय अहवाल उपलब्ध नसतील त्या कालावधीत संबंधित अधिकारी, पदोन्नतीने / बदलीने अन्यत्र रुजू झाला असल्यास, सेवानिवृत्त, निलंबित झाला असल्यास वा प्रतिनियुक्तीवर गेला असल्यास त्याचा उल्लेख करावा. आधीच्या कार्यालयातून ज्या कार्यालयात रुजू झाला असेल त्या आधीच्या कार्यालयाचा उल्लेख (ज्या कालावधीत संबंधित अधिकारी कार्यरत होता) करण्यात यावा.

१०) गोपनीय अहवालावर प्रतिवेदन अधिकारी व पुनर्विलोकन अधिकारी यांच्या सह्या होणे आवश्यक असून त्यांच्या सह्या नसल्यास त्याबाबतची कारणे नमूद करण्यात यावीत.

३. सदरहू शासन परिपत्रकातील सूचना सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणण्यात याव्यात. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेताक **२०११०११४१६४६१४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(नं.मा.शिलवंत)**
उप सचिव
महसूल व वन विभाग

पति,

प्रधान मुख्य वनसंरक्षक (हेड ऑफ द फॉरेस्ट फोर्स), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक,(मानव संसाधन,प्रशासन व व्यवस्थापन),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर.
संचालक,सामाजिक वनीकरण संचालनालय,पुणे.
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखाव अनुज्ञेयता),महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
सह सचिव (कार्यासन फ-७), महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग (जल-१३), मंत्रालय, मुंबई-३२.
सर्व मुख्य वनसंरक्षक / सर्व वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव).
मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक.
सर्व विभागीय वन अधिकारी / सहा.वनसंरक्षक (प्रधान मुख्य वनसंरक्षक, म.रा.नागपूर यांचे मार्फत)
वन विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती (फ-८ कार्यासन)महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.(दोन प्रती)